सरळसेवा प्रविष्ट सहाय्यक अभियंता श्रेणी-१ यांच्या सविस्तर नियुक्तीच्या ठिकाणामध्ये अंशत: बदल करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक बांधकाम विभाग
## शासन आदेश क्रमांकः एलटीएस २०१७/ प्र.क्र.७९/सेवा-२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: १३.०४.२०१७

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः जीएबी २०१५/प्र.क्र.२८६ (भाग-२)/सेवा-२, दिनांक ११.३.२०१६
२) शासन निर्णय क्रमांकः जीएबी २०१५/प्र.क्र.२८६ (भाग-२)/सेवा-२, दिनांक ३०.३.२०१७

## शासन आदेश

उपरोक्त अ.क्र. १ वरील शासन निर्णयान्वये खाली नमूद केलेल्या अभियंत्यांना सार्वजनिक बांधकाम विभागात महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवेतील सहाय्यक अभियंता श्रेणी-१, गट-अ या पदावर दोन वर्षाच्या परिवीक्षाधीन कालावधीसाठी नियुक्त्या देण्यात आल्या असून, प्रथम वर्षाच्या परिवीक्षाधीन कालावधीसाठी महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण संस्था, नाशिक येथे प्रशिक्षणासाठी पाठविण्यात आले होते. तसेच अ.क्र.२ वरील शासन निर्णयान्वये सदर उमेदवारांचे प्रथम वर्षाचे प्रशिक्षण दिनांक ३१ मार्च २०१७ रोजी संपुष्टात आणून त्यांना सविस्तर नियुक्त्या देण्यात आलेल्या आहेत.

२. या आदेशान्वये, अ.क्र. २ वरील शासन निर्णयान्वये प्रथम वर्षाचे प्रशिक्षण दिनांक ३१.३.२०१७ रोजी संपुष्टात आणून सविस्तर नियुक्त्या देण्यात आलेल्या खालील सहायक अभियंता श्रेणी-१ यांच्या सविस्तर नियुक्तीच्या ठिकाणांमध्ये, त्यांच्या विनंतीनुसार व प्रशासकीय कारणास्तव, सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने त्यांच्या नावासमोर दर्शविल्याप्रमाणे अंशत: बदल करुन सविस्तर नियुक्त्या देण्यात येत आहेत. सदर नियुक्त्या पुढील आदेश होईपर्यंत अंमलात राहतील.

| अ.क्र. | सहाय्यक अभियंता श्रेणी-१ यांचे नांव व जात प्रवर्ग | दिनांक ३०.३.२०१७ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेले सविस्तर नियुक्तीचे ठिकाण | अंशत: बदल करुन देण्यात येत असलेले सविस्तर नियुक्तीचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | श्री. संदिप भगवान पवार | जि.प.(बां) उप विभाग, झरी जामणी | मार्ग प्रकल्प उप विभाग क्र.१, यवतमाळ |
| २ | श्री. धीरज सिध्दप्पा बड्डे, (भ.ज.(क) ) | जि.प.(बां) उप विभाग, वडसा | सा.बां. उप विभाग, धानोरा (दक्षिण), जि. गडचिरोली |
| ३ | श्री.चेतन विलासराव बिरारीस, (इ.मा.व.) | जि.प.(बां) उप विभाग, हिंगोली | उप कार्यकारी अभियंता, सा.बां. विभाग, जालना |

| **अ.क्र.** | **सहाय्यक अभियंता श्रेणी-१ यांचे नांव व जात प्रवर्ग** | **दिनांक ३०.३.२०१७ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेले सविस्तर नियुक्तीचे ठिकाण** | **अंशत: बदल करुन देण्यात येत असलेले सविस्तर नियुक्तीचे ठिकाण** |
|---|---|---|---|
| ४ | श्री.आशिष गिरिधर कुर्वे, (इ.मा.व.) | जि.प.(बां) उप विभाग, पोंभूर्णा | जि.प. बांधकाम उप विभाग, भंडारा |
| ५ | श्रीमती नंदिनी विजय गुरवे | उप कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग, परतूर | उप कार्यकारी अभियंता, रा.म. विभाग, नांदेड |
| ६ | श्रीमती मनिषा सुधाकर भोये, (अ.ज.) | उप कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग, जालना | उप अभियंता, संकल्पचित्र विभाग, औरंगाबाद |

३. उपरोक्त सहायक अभियंता श्रेणी-१ यांच्या सविस्तर नियुक्तीबाबतच्या इतर अटी व शर्ती शासन निर्णय क्रमांकः जीएबी २०१५/प्र.क्र.२८६ (भाग-२)/सेवा-२, दिनांक ३०.३.२०१७ मध्ये नमूद केल्याप्रमाणे राहतील.

४. प्रादेशिक विभागात नियुक्ती दिलेल्या संबंधित अभियंत्यांना कळविण्यात येते की, त्यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी रजेवर न जाता किंवा कोणत्याही प्रकारे नियुक्तीमध्ये बदल करण्याचे/ नियुक्ती रद्द करण्याचे अभिवेदन न करता तात्काळ रुजू व्हावे. या आदेशाचे पालन न करणाऱ्या अभियंत्यांविरूध्द शिस्तभंगाची कार्यवाही केली जाईल.

५ . संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग / मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना कळविण्यात येते की, त्यांच्या प्रादेशिक विभागात नियुक्ती दिलेले अभियंते तात्काळ हजर न झाल्यास त्यांची नावे शासनास कळवावीत. जेणेकरुन शासनस्तरावर पुढील कार्यवाही करणे शक्य होईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१३१९३७४४७०१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind J Kamble

Digitally signed by Arvind J Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c7145f142d7f8e597c7957f95eeba7e16ac871e58cfc3b203f7c1273111cfb15, cn=Arvind J Kamble
Date: 2017.04.13 19:39:41 +05'30'

**(अ.ज. कांबळे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल-१ / २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर/ औरंगाबाद
३. मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग, कोकण भवन, नवी मुंबई

४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, भंडारा

५. संबंधित सर्व सहाय्यक अभियंता श्रेणी-१ यांना मुख्य अभियंता, सा.बां. प्रादेशिक विभाग, नागपूर/ औरंगाबाद यांच्याद्वारे

६. मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम (उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

७. मा. मंत्री सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

८. मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (उपक्रम वगळून)यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

९. मा. राज्यमंत्री सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

१०. प्रधान सचिव (सा.बां.) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

११. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२. सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहाय्यक , सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई.

१३. संगणक कक्ष, सा.बां.विभाग,मंत्रालय, मुंबई,

१४. कार्यासन सेवा-२ (निवडनस्ती) सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.